**राज्यात माहे मे, २०१८ या कालावधीत अवेळी पाऊस व गारपीट यामुळे झालेल्या शेतीपिके व फळपिकांच्या नुकसानीसाठी मदत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-२०१८/प्र.क्र.१३८/म-०३**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- १८ डिसेंबर, २०१८

**वाचा :-** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दि.१३ मे,२०१५

**प्रस्तावना :**

राज्यात माहे मे, २०१८ या कालावधीत अवेळी पाऊस व गारपीट यामुळे एकूण १३ जिल्ह्यांमध्ये शेतीपिके/फळपिकांचे नुकसान झाले असल्याचे आढळून आले आहे. महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १३ मे, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आलेल्या SDRF च्या निकषानुसार मदत देण्यासंदर्भात दिनांक १० डिसेंबर, २०१८ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ उपसमितीच्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

राज्यात माहे मे, २०१८ मध्ये राज्यातील १३ जिल्हयांमध्ये झालेल्या अवेळी पाऊस व गारपीट यामुळे शेती पिकाचे व फळपिकांचे नुकसान झालेल्या बाधित शेतक-यांना संदर्भाधीन शासन निर्णयात विहित केलेल्या दराने मदतीचे वाटप करण्यासाठी या शासन निर्णया सोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे एकूण रु.२,९३,००,६५५/- (रूपये दोन कोटी त्र्यान्नव लक्ष सहाशे पंचावन्न फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. बाधित शेतकऱ्यांना मदतीचे वाटप करतांना खालील अटी व शर्तीची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी :-

१) महसूल विभाग व कृषि विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करण्यात आलेल्या संयुक्त पंचनाम्याच्या आधारे पिकांचे ३३% किंवा त्यापेक्षा जास्त नुकसान झालेल्या प्रकरणी मदत अनुज्ञेय राहील.

२) मदतीची रक्कम संबंधित बाधितांच्या बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी. कोणत्याही बाधितांना रोख अथवा निविष्ठा स्वरुपात मदत देण्यात येऊ नये.

३) पिकांच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करतांना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये.

४) सदर रक्कमेचे वाटप पूर्ण झाल्यानंतर, रक्कम वाटप करण्यात आलेल्या लाभार्थ्यांची यादी त्यांना प्रदान केलेल्या रक्कमेच्या माहितीसह, जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी. तसे केल्याचे प्रमाणपत्र व निधीचा विनियोग केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनाकडे पाठविण्यात यावे.

५) बाधित शेतकऱ्यांना वाटप करावयाचे मदतीची रक्कम संबंधित शेतकऱ्यांच्या आधार संलग्नित बँक खात्यामध्ये थेट हस्तांतर पध्दतीने (Direct Benefit Transfer) पध्दतीने प्रदान करावी. परंतु एखाद्या व्यक्तीकडे आधार क्रमांक नसेल तर अशी व्यक्ती लाभापासून वंचित राहू नये म्हणून अन्य पर्यायी व व्यवहार्य ओळखपत्राच्या आधारे (उदा. आधार ओळख नोंदणी पावती, भारत निवडणूक आयोगाने दिलेले

मतदान ओळखपत्र, आयकर विभागाने दिलेले स्थायी लेखा क्रमांक पत्र (PAN), वाहन चालनाचा परवाना, पारपत्र, बँकेची पुस्तीका) खातरजमा करुन प्रदान करण्यात यावी.

३. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशिर्ष- २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इ., १०१,अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत (२२४५ २४५२), सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उपलेखाशिर्षातंर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षी उपलब्ध असलेल्या तरतूदींमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१८११४०४३२२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Ramchandra Bagane

Digitally signed by Dilip Ramchandra Bagane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d9bdeba4f5b208a7811899a0f4522d8086dc2e6e2655bea26b70db55378254d2, serialNumber=a4ff332f80ce4e5a25f28d86597d7ac1c7ca6c95d9241be4eb51488570f63a29, cn=Dilip Ramchandra Bagane
Date: 2018.12.18 11:48:05 +05'30'

**( दि.रा.बागणे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. आयुक्त(कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
८. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती )
९. महालेखापाल -१/२ (लेखापरिक्षा ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती )
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई-३२
११.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.उपसचिव, (आव्यप्र-१/आव्यप्र-२/म-७/म-११/ब-१/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
१३.वित्त विभाग (व्यय-९ /व्यय-३/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-६ ), मंत्रालय, मुंबई.
१४. कार्यासन म-३ (निवडनस्ती ).

## शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-सीएलएस-२०१८/प्र.क्र.१३८/म-०३, दिनांक :- १८ डिसेंबर, २०१८ चे परिशिष्ट

| विभाग | जिल्हा | बाधित शेतकरी संख्या | एकूण बाधित क्षेत्र (हे.) | आवश्यक निधी (रु.) |
|---|---|---|---|---|
| **कोकण** | रत्नागिरी | ६२३ | १९४.४१ | ३४९९३८० |
| **एकूण कोकण** | | **६२३** | **१९४.४१** | **३४९९३८०** |
| **पुणे** | पुणे | १४७ | ११८.६ | २१२५३८० |
| | सातारा | ६१० | ३१७.५० | २०१३०७५ |
| | सांगली | ११०३ | ६५५.३४ | ११७८८०२० |
| | सोलापूर | २३३ | १२८.३७ | १९७३१६० |
| | कोल्हापूर | ७७५ | २२१.६९ | ३२०९३१० |
| **एकूण पुणे** | | **२८६८** | **१२४१.५०** | **२११०८९४५** |
| **नाशिक** | धुळे | १ | ०.६० | ८१०० |
| | अहमदनगर | ३८० | ११८.७३ | २१२७२४० |
| **एकूण नाशिक** | | **३८१** | **११९.३३** | **२१३५३४०** |
| **औरंगाबाद** | परभणी | २० | १४.१० | २०६१०० |
| | हिंगोली | १७८ | ३४.१८ | ४८०३३० |
| | लातूर | २ | १.९० | २८८०० |
| | नांदेड | २७६ | ९८.३६ | १३४८६५० |
| **एकूण औरंगाबाद** | | **४५४** | **१४९.३४** | **२०६३८८०** |
| **अमरावती** | यवतमाळ | ८३ | ३६.१६ | ४९३११० |
| **एकूण अमरावती** | | **८३** | **३६.१६** | **४९३११०** |
| **एकूण राज्यात** | | **४४०९** | **१७४०.७४** | **२९३००६५५** |